**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना विमाकवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै.(श्री.) साहेबराव गोपीनाथ भालशंकर, सह शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.२४/टीएनटी-६**
:MSC-16014/16/2025-MSC-(TNT-6)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २२ मे, २०२५

<u>संदर्भ</u> :-

(१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१

(२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.

(३) तहसिलदार, उस्मानाबाद यांचे प्रमाणपत्र क्र.२०२२/संकीर्ण/कावी-१८६, दिनांक १२/१०/२०२२

(४) शिक्षण संचालक(माध्यमिक) यांचे पत्र क्र. शिसंमा/२०२३/टि-७/कोव्हिड-१९/विमा कवच/सहाय्य/भालशंकर/१०५९, दि. ३१/०१/२०२४

<u>ज्ञापन</u> :-

कै.(श्री.) साहेबराव गोपीनाथ भालशंकर, सह शिक्षक,कै.शकुंतला देशमुख प्रशाला अनसुर्डा ता. जि. उस्मानाबाद यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९मुळे दिनांक ०६/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) भालशंकर यांच्या पत्नी श्रीमती नंदु साहेबराव भालशंकर यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक २३/३/२०२२ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब कै.(श्री.) भालशंकर यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.(१) येथील दि. २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे यांनी संदर्भ क्र.(४) येथील पत्रांन्वये शिफारसीसह सादर केला आहे.

३. कै.(श्री.) साहेबराव गोपीनाथ भालशंकर, सह शिक्षक,कै.शकुंतला देशमुख प्रशाला अनसुर्डा ता. जि. उस्मानाबाद या शाळेत दिनांक ०१/१०/१९९२ पासून कार्यरत असल्याचे सेवापुस्तकावरील नोंदीवरुन दिसून येते.

४. तहसिलदार तथा इन्सिडंट कमांडर, उस्मानाबाद यांचे दिनांक १२/०४/२०२१ रोजीच्या आदेशान्वये कोव्हिड-१९ करिता प्रभावी सर्वेक्षण, गृहविलगीकरण करण्यात आलेल्या रुग्णांची निगराणी आणि अतिसंवेदनशील रुग्णांचे व्यवस्थापन करणेसाठी दक्षता समिती स्थापन करण्यात आली होती. सदर आदेशाच्या अनुषंगाने ग्रामेसवक/सरपंच, ग्रामपंचायत कार्यालय, अनसुर्डा यांचे दिनांक २०/०४/२०२१ रोजीच्या आदेशानुसार मुख्याध्यापक, कै.शकुंतला देशमुख प्रशाला अनसुर्डा ता. जि. उस्मानाबाद यांचे दिनांक २१/०४/२०२१ अन्वये कै. (श्री.) भालशंकर यांची नियुक्ती कोरोना प्रतिबंधक समिती, अनसुर्डा येथे करण्यात आली होती.

५. कै. (श्री.) भालशंकर यांची दि. ०३/०५/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते.

६. कै.(श्री.) भालाशंकर हे दिनांक २/०४/२०२१ ते दिनांक ०३/०५/२०२१ रोजी पर्यंत कोरोना कर्तव्यावर हजर होते . कर्तव्य बजावताना म्हणजेच दिनांक ०३/०५/२०२१ रोजी त्यांचा कोव्हिड चाचणी अहवाल पॉझीटीव्ह आला व दिनांक ०६/०५/२०२१ रोजी कोरोनामुळे निधन झाले. त्यानुसार सदर कर्मचारी हे इस्पितळात दाखल होण्याच्याअथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर असल्याबाबत तहसिलदार, उस्मानाबाद यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै. (श्री.) भालशंकर यांचा दिनांक ०६/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्रफॉर्म क्र.४द्वारे वैद्यकीयअधिकारी, जिल्हा रुग्णालय, उस्मानाबाद यांनी प्रमाणित केले आहे.

८. कै.(श्री.) शेख यांचा दिनांक ०६/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र निबंधक (जन्म व मृत्यु),उस्मानाबाद यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

९. मा. ३ रे सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, उस्मानाबाद यांनी कै. (श्री.) भालशंकर यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती नंदु साहेबराव भालशंकर (२) कुमार राजदीप साहेबराव भालशंकर (३) राजकन्या साहेबराव भालशंकर यांना घोषित केले आहे.

१०. कै.(श्री.) साहेबराव गोपीनाथ भालशंकर, सह शिक्षक,कै.शकुंतला देशमुख प्रशाला अनसुर्डा ता. जि. उस्मानाबाद यांना २२०२ ०४४२ या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव यांनी प्रमाणित केले आहे.

११. तहसिलदार, उस्मानाबाद व वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रुग्णालय, उस्मानाबाद यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच मा. ३ रे सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, उस्मानाबाद यांनी कै.(श्री.) भालशंकर यांचे कायदेशीर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) श्रीमती नंदु साहेबराव भालशंकर (२) कुमार राजदीप साहेबराव भालशंकर (३) राजकन्या साहेबराव भालशंकर यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र. ६१३/व्यय-५, दि.०८/०५/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण शाळांना सहायक अनुदान
अनिवार्य (२२०२ ०४४२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्षपणे प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०५२२१८३१२४८२२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APPASING
RAMSING RAJPUT

Digitally signed by APPASING RAMSING RAJPUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education and Sports,
2.5.4.20=81C03748EA91B5CA6EB76216FADD8CFC070967B2826BADC6BA66DC8151A5B97A, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=02486C751E1117F7DF4BDEA131CC54D2A4486AA35E5AB82CE788466F2EC90916, cn=APPASING RAMSING RAJPUT
Date: 2025.05.22 18:32:17 +05'30'

**( आ. रा. राजपूत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव.
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), धाराशिव.

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस.एम.४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती नंदु साहेबराव भालशंकर (कै. (श्री.) साहेबराव गोपीनाथ भालशंकर यांच्या पत्नी.)
४. निवड नस्ती/(टीएनटी-६) (प्र.क्र.२४/२०२४)